**महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, छत्रपती संभाजीनगर मौजे कांचनवाडी येथे विविध इमारतींचे बांधकाम करण्यासाठी देण्यात आलेल्या मान्यतेमध्ये जीएसटी फरक रक्कम, कामगार विमा व वाढीव भाववाढ यांचा समावेश करुन सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...**

# महाराष्ट्र शासन

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/ई-९५२९०६/विशि-२**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक : २० मार्च, २०२५.

**पहा : -** १) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२ दि.१७.०४.२०१५.

२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग शासन निर्णय क्रमांक: एनएलयु-२०१९/प्र.क्र.८६/विशि-२ दि.०८.०७.२०२२.

३) कुलसचिव, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, छत्रपती संभाजीनगर यांचे पत्र क्र.एमएनयूए/वीसीओ/२०२४-२५/३५३, दि.०५.०९.२०२४.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, छ.संभाजीनगर मौजे कांचनवाडी परिसरात १.Centre of Excellence, २.मुलांचे वसतीगृह, ३.मुलींचे वसतीगृह, ४.प्रवेशद्वार, ५.रस्ते व संरक्षणभिंत, ६.मेस इमारत व इतर अनुषंगिक कामे करण्यासाठी रु.१४९७२.१८ लक्ष रकमेच्या अंदाजपत्रकास संदर्भ क्र.२ येथील दि.०८.०७.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदरहू प्रशासकीय मान्यतेस अनुसरुन संपूर्ण निधी विद्यापीठास वितरीत करण्यात आला आहे. आता या कामाच्या अंदाजपत्रकात जीएसटी फरक, कामगार विमा व भाववाढ समावेश करुन निधी देण्याची संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये विद्यापीठाने विनंती केली होती.

सदर विनंतीस अनुलक्षून सदर प्रस्तावाची पडताळणी करुन देण्याची सार्वजनिक बांधकाम विभागास विनंती करण्यात आली होती. सदर प्रस्तावाची पडताळणी करुन प्रस्तावित खर्च १५% च्या मर्यादेत असल्याने संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयातील तरतूदीनुसार कार्यवाही करण्याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाने नमूद केले आहे. तद्नुषंगाने संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयातील तरतूदीस अनुसरुन प्रस्तावित सुधारीत प्रशासकीय मान्यता मूळ खर्चाच्या १५ टक्के च्या मर्यादेत असल्याने विभागास असलेल्या अधिकारानुसार दि.०८.०७.२०२२ च्या शासन निर्णयात जीएसटी फरक रक्कम, कामगार विमा व भाववाढ यांचा समावेश करुन **रु.१६८२९.४७ लक्ष** इतक्या किंमतीस सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

दि.०८.०७.२०२२ रोजीच्या शासन निर्णय अन्वये रु.१४९७२.१८ लक्ष रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर अंदाजपत्रकात जीएसटी फरक १८ टक्के, कामगार विमा १ टक्के व वाढीव भाववाढ याकरीता रु.१८५७.२९ लक्ष इतकी रक्कम समाविष्ट करुन रु.१६८,२९,४७,०००/- (रुपये एकशे अडुसष्ट कोटी एकोणतीस लक्ष सत्तेचाळीस हजार फक्त) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी :-**

१. उपरोक्त सुधारीत अंदाजपत्रकीय किंमतीत काम पूर्ण होईल याची विद्यापीठाने दक्षता घ्यावी.
२. दि.०८/०७/२०२२ च्या शासन निर्णयामधील अटी व शर्ती कायम राहतील.
३. प्रत्यक्ष रकमांचे प्रदान करण्याआधी व करातील वाढ सनदी लेखापाल यांच्याकडून तपासून घेऊन व अंदाजपत्रकातील अन्य आकडेमोड अचूक असल्याची खात्री करुन विद्यापीठाने देयक अदा करण्याची कार्यवाही करावी.

२. हा शासन निर्णय, वित्त विभाग शासन क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग-पाच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ अन्वये इमारती व कामाच्या बाबतीत नकाशे व अंदाजित खर्च यांना सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत विभागास असलेल्या अधिकारानुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन (अनौपचारिक संदर्भ क्र.३६/इमा-३, दि.१०.०३.२०२५) निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर खर्च "मागणीक्रमांक - डब्ल्यु-२, प्रधानशिर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३-विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२-विद्यापीठांना सहाय्य, - (००) (२१) विधी विद्यापीठाचा विकास (२२०२ जी ९५९), ३१ सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली मंजूर तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०३२०१४४९३३७४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

PRATAP PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=b0d6763338fc6cc4f7cf07ca60db7abc1cfac99c84ab1b5bfc0dae4609d631d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF6895C47A84066432F5BDD1F182B4163D880AC9BD8D24A198FD0E7310BBEB59, cn=PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2025.03.20 14:51:07 +05'30'

**(प्रताप पां लुबाळ)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे अ.मु.स, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री (नगर विकास) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा.कुलपती, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, छत्रपती संभाजीनगर.
८. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई.
१०. अपर मुख्य सचिव (सार्वजनिक बांधकाम), मंत्रालय, मुंबई.
११.अपर मुख्य सचिव (उच्च व तंत्र शिक्षण), मंत्रालय, मुंबई.
१२.महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१३.महालेखापाल, (लेखा परीक्षण) -१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१४.संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१५.कुलसचिव, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, छत्रपती संभाजीनगर.
१६.अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, छत्रपती संभाजीनगर
१७.कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, छत्रपती संभाजीनगर
१८.अवर सचिव (अर्थसंकल्प), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९.निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.